ग्रामीण निवारा योजना
राज्यात ग्रामीण/नागरी भागात आर्थिकदृष्टया
दुर्बल/बेघर/अल्प भूधारक घटकासाठी
घरकुल योजना

# महाराष्ट्र शासन,

## गृहनिर्माण विभाग,

शासन निर्णय क्रमांक : घरकुल २०००/प्र.क्र.३३०/गृनिधो-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक २५ सप्टेंबर, २००१.

**प्रस्तावना :**

राज्यात ग्रामीण/नागरी भागात आर्थिकदृष्टया दुर्बल घटक, बेघर आणि अल्पभूधारक यांच्याकरीता घरकुल योजना राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर योजना **ग्रामीण निवारा योजना** या नांवाने राबविण्याबाबत खालीलप्रमाणे शासन आदेश देत आहे.

**शासन निर्णय :**

राज्यातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटक, बेघर, अल्प भूधारक लोकांसाठी ग्रामीण भागात ३३,००० व ५०,००० पेक्षा कमी लोकसंख्या असणाऱ्या शहरात १८,००० अशी एकूण ५१,००० घरे दरवर्षी बांधण्याचा निर्णय शासनाने घेतला असून यापैकी प्रथम टप्प्यात ग्रामीण भागात १६५०० घरे आणि ५०,००० पेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या नागरी भागात ९००० घरे बांधण्याचा निर्णय घेतला आहे. प्रस्तूत योजनेची अंमलबजावणी दिनांक -२ ऑक्टोबर, २००१ पासून करण्यात यावी.

१) योजनेची व्याप्ती व उद्दीष्टे

मुंबई व मुंबई उपनगर ही जिल्हे वगळून राज्यातील ३३ जिल्हयाकरीता ग्रामीण निवारा योजना या नांवाने खालीलप्रमाणे योजना राबविण्यात यावी.

| अ.क्र. | योजनेचे नांव | योजनंतर्गत जिल्हयांत बांधण्यात यावयाची घरांची संख्या. |
|---|---|---|
| १. | ग्रामीण निवारा योजना | १२५ |
| २. | प्रधान मंत्री ग्रामोदय योजना | ३७५ |
| ३. | ५०,००० पेक्षा कमी लोकसंख्या | २५० |

| | | |
|---|---|---|
| | असलेल्या शहरात राबविण्यांत येणारी योजना | |
| | **एकूण** | **७५०** |

वरील (१) व (२) येथील योजना महानगरे व मोठया शहरापासून २० की.मी. आणि लहान व मध्यम शहरांपासून ५ कि.मी. अंतराबाहेर राबविण्यात यावी. नागरी भागामध्ये योजना राबवितांना ५०,००० पेक्षा कमी लोकसंख्या असणाऱ्या शहरात राबविण्यात यावी.

या सर्व योजनेअंतर्गत बांधण्यात येणाऱ्या घरापैकी कमीत कमी ६० टक्के घरे ही अनुसूचित जाती, जमाती, व वेठबिगारासाठी बांधणे आवश्यक आहे. जर खुला वर्ग व इतर संवर्गातील पुरेशे लाभार्थी उपलब्ध होऊ शकले नाहीत, तर त्यांच्यासाठी राखून ठेवण्यात आलेल्या घरांची संख्या, अनुसूचित जाती व संवर्गातील लाभार्थ्यांच्या घरबांधणीसाठी वापरण्यात यावी.

## २) पात्र लाभार्थी व लाभार्थ्यांनी करावयाची पूर्तता.

१) लाभधारक कुटुंब हे योजनेच्या लाभ क्षेत्रात वास्तव्य करणारे असावे. मात्र त्यांना वास्तव्याचा पुरावा म्हणून रेशनकार्ड, मतदार यादीमध्ये नांव व इतर सबळ पुरावे सादर करणे आवश्यक राहील.

२) ग्रामीण निवारा योजनेंतर्गत लाभार्थी कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रु. ३२,०००/- पेक्षा जास्त नसावे, उत्पनाबाबत ग्रामपंचायत, तहसिलदार/गट विकास अधिकारी यांचे प्रमाणपत्र असावे.

३) लाभधारकाने यापूर्वी इंदिरा आवास योजनेखाली अगर इतर आवास योजनेखाली अनुदान घेतलेले नसावे. ज्या कुटुंबियांचे वार्षिक उत्पन्न रु. २०,०००/- पेक्षा कमी आहे व जे दारिद्र रेषेखालील आहेत व ज्यांना इंदिरा आवास योजनेअंतर्गत लाभ मिळालेला नाही अशा कुटुंबियांना परिशिष्ट अ मधील मार्गदर्शक तत्वानुसार प्रधान मंत्री ग्रामोदय योजनेचा (ग्रामीण आवास) लाभ देण्यात यावा.

४) या योजनांमध्ये अपंगाना तसेच स्त्रियांना ( यामध्ये विधवा, घटस्फोटीत, परित्यक्ता स्त्रियांना, इ. चा समावेश करण्यांत यावा.) प्राधान्य देण्यात यावे.

५) या योजनेअंतर्गत बांधण्यात येणारे घर लाभार्थी स्त्रियांच्या, पत्नी किंवा पती-पत्नीच्या संयुक्त नांवाने करावे.

६) लाभधारक कुटुंबांच्या मालकीचे घर असू नये. मात्र अस्तित्वात असणारे घर मोडकळीस आले असेल तर त्या कुटुंबाला घराच्या पुनर्बांधणीचा लाभ देण्यात यावा. अस्तीत्वात असणारे घर मोडकळीस आलेले आहे. अशा स्वरुपाचे त्या गावामधील ग्रामसेवकाने/सरपंचाने प्रमाणित केलेले प्रमरणनत्र किंवा स्वतःचे शपथपत्र त्यांना सादर करावे लागेल.

७) लाभधारक कुटुंबाने या योजनेअंतर्गत घरबांधणीसाठी अनुदान मिळणेबाबतच्या अर्जासोबत घरबांधणीस येणाऱ्या खर्चाच्या १० टक्के रक्कम त्याचा सहभाग म्हणून बँकेत खाते उघडून जमा करणे आवश्यक आहे. अनुसूचित जमाती संवर्गातील लाभार्थी कुटुंबास बँकेत खाते सुरु करण्यासाठी आवश्यक किमान रक्कमे व्यतिरिक्त त्याच्या सहभागाची रक्कम भरण्याची आवश्यकता राहणार नाही. लाभधारक कुटुंबांनी आपले अर्ज बँकेत खाते उघडल्याच्या पुराव्यासहीत संबंधित ग्रामपंचायत/नगरपालिकेच्या कार्यालयात सादर करावेत.

८) अनुसूचित जातीच्या/जमातीच्या लाभार्थ्यांने सक्षम प्राधिकराऱ्याने दिलेला जातीचा दाखला अर्जासोबत जोडणे आवश्यक आहे.

९) गावात/गावठाणात लाभधारकाच्या मालकीचे घर अथवा भूखंड नसल्यास, त्याच्या स्वतःच्या मालकीच्या असलेल्या शेतावर घर बांधण्यास मुभा राहील.

१०) योजनेअंतर्गत गावात/शहरात किमान २५ घराची मागणी असणे आवश्यक आहे.

३) **योजनेची अंमलबजावणी**

ग्रामीण भागात जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा व नागरी भागात नगर परिषद योजनेची अंमलबजावणी करेल. यासाठी योजनेअंतर्गत कोण्त्या गावांत/खेडयात घरे बांधावयाची आहेत याबाबत निर्णय घेण्यास जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेस प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच नागरी भागात घरे कोणत्या शहरात बांधावयाची आहेत याबाबतचा निर्णय घेण्यास संबंधित जिल्हाधिकारी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट **"ब"** मध्ये दिलेल्या कालबध्द कार्यक्रमाप्रमाणे योजनेच्या अंमलबजावणीसाठी स्थानिक अधिकाऱ्याकरवी त्यांच्याशी संबंधित सर्व कामे करावीत. त्यात सामाजिक न्याय, आदिवासी

विकास विभाग, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, यांनी योजना यशस्वीरित्या राबविण्यासाठी सहकार्य करावे.

४) **प्रशासकीय मान्यता, लाभार्थीची निवड व संनियंत्रण**

विभागीय आयुक्तांनी त्यांच्या मासिक आढावा बैठकीत ग्रामीण व नागरी भागातील योजनेवर पूर्णपणे देखरेख करुन आढावा घ्यावा. त्याप्रमाणे शासनास कळवावे.

**(अ) गृहनिर्माण कक्ष**

प्रत्येक जिल्हयात जिल्हाधिकारी यांचे नियंत्रणाखाली त्यांच्याच कार्यालयात जिल्हा गृहनिर्माण कक्ष सुरु करावा. याकरिता, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाने राज्यातील बृहन्मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळता उर्वरित ३३ जिल्हयांकरीता जिल्हा गृहनिर्माण अधिकाऱ्यांची नेमणूक करावी. ही नेमणूक म्हाडाकडे उपलब्ध असणाऱ्या पदांमधून करावी. जिल्हा गृहनिर्माण अधिकारी हा जिल्हाधिकाऱ्याच्या कार्यालयात गृहनिर्माण कक्षात काम करेल. तसेच या गृहनिर्माण कक्षासाठी आवश्यक असणारा इतर कर्मचारीवृंद संबंधित जिल्हाधिकाऱ्याने नवीन पदे निर्माण न करता उपलब्ध कर्मचाऱ्यांमधून द्यावयाचा आहे.

**(ब) नागरी भागातील योजना.**

जिल्हाधिकारी यांनी या कक्षाच्या माध्यमातून जिल्हयात सुरु असलेल्या कामावर संनियंत्रण व देखरेख ठेवावी. जिल्हाधिकारी यांनी योजनेच्या अंमलबजावणीकरीता व योजनेच्या प्रगतीचा आढावा घेण्याकरीता महिन्यातून संबंधित विभागाच्या अधिकाऱ्यांसमवेत बैठक आयोजित करावी, आणि अहवाल शासनास सादर करावा.

नागरी भागातील निवारा योजनेंच्या प्रस्तावांना प्रशासकीय आणि वित्तीय मान्यता देण्याचे अधिकार जिल्हाधिकाऱ्यांना राहतील.

**क) ग्रामीण भागातील योजना**

या योजनेअंतर्गत लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी तसेच या योजनेबाबत मार्गदर्शन करण्यासाठी व नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी या योजनेची नोडल एजन्सी म्हणून जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या कार्यकारी समितीची राहील. कार्यकारी समितीने संबंधित विभागाच्या जिल्हा समाजकल्याण अधिकारी, प्रकल्प अधिकारी (एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प) रोजगार व स्चयंरोजगार या कार्यालयातील अधिकारी व इतर विभागाच्या संबंधित अधिकाऱ्यांना बैठकीस निमंत्रित करावे. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेने ग्रामीण निवारा

योजनेच्या अंमलबजावणीच्या प्रगतीचा आढावा घेण्याकरीता किमान महिन्यातून एकदा बैठक आयोजित करावी.

ग्रामीण निवारा योजनेच्या प्रस्तावांना प्रशासकीय आणि वित्तीय मान्यता देण्याचे अधिकार जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या कार्यकारी समितीस राहतील.

## ५) **योजनेअंतर्गत जमिनीची उपलब्धता**

लाभार्थ्यांने स्वतःच्या मालकीच्य जमिनीवर स्वतः घर बांधावे किंवा घर बांधण्यासाठी स्वतःची मालकीची जमीन नसेल तर या योजनेअंतर्गत बांधण्यात येणाऱ्या घरकुलासाठी शासकीय/ग्रामपंचायतीच्या मालकीच्या/वाढीव गावठाणे इत्यादींची जमीन जिल्हाधिकारी यांनी विनामुल्य उपलब्धै् करुन द्यावी. वाढीव गावठाण आणि प्रकल्पग्रस्तांसाठी राबविण्यात याव्यात. नगरपरिषदेने त्यांच्या मालकीच्या जमीनी योजनेसाठी विनामुल्य उपलब्ध करुन द्याव्यात. मात्र या योजनांसाठी खाजगी जमीन संपादित केली जाणार नाही.

## ६) **योजनेअंतर्गत बांधण्यात येणाऱ्या घराबाबत**

योजनेअंतर्गत लाभार्थ्यांने स्चतःचे घरकुल स्वतःच बांधावयाचे असून त्यासाठी आवश्यक असणारे तांत्रिक सहाय्य माहराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा) यांनी नियुक्त केलेल्या जिल्हा गृहनिर्माण अधिकारी आणि जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडून घ्यावे. त्यामध्ये आराखडा व नकाशांना मंजूरी, बिगर शेती/अकृषिक वापर परवाना सक्षम प्राधिकाऱ्याद्वारे प्राप्त करण्यासाठी सहाय्य करणे, बांधकाम साहित्याबाबत मार्गदर्शन करणे, जमीन मिळवून देण्यास मदत करणे, इत्यादी बाबींचा समावेश असेल. या योजनेअंतर्गत बांधण्यात येणाऱ्या घराचे क्षेत्रफळ व त्याची अंदाजित किंमत पुढीलप्रमाणे असेल :-

| **अ.क्र.** | **घराचे क्षेत्रफळ (चौ.फुटामध्ये)** | **घराची किंमत (रुपये )** |
|---|---|---|
| १. | १५० | २०,००० |
| २. | १८० ते २२५ | ३०,००० |
| ३. | २२५ पेक्षा जास्त | ५०,००० |

जिल्हा परिषदेमार्फत ग्रामीण भागात राबविण्यात येत असलेल्या योजनेतून शौचालय, धूररहित चुली व इतर सोयी/सुविधा देण्यात याव्यात. याप्रमाणे नागरी भागात नगरपालिकेने सुध्दा कार्यवाही करावी.

## ७) **इमारत निर्मिती केंद्र**

या योजनेला चालना देण्याकरिता तसेच स्थानिक पातळीवर रोजगार उपलब्ध व्हावा यासाठी राज्यात १०० इमारत निर्मिती केंद्रे उभारण्यात यावीत. निर्मिती केंद्राचे कार्य शासन निर्णय, गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग क्रमांक १०९३/प्र.क्र.३९०/कार्यासन-६, मंत्रालय, मुंबई ३२, दिनांक २ जुलै, १९९३ प्रमाणे असेल. म्हाडाने/जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेने हुडकोच्या मार्गदर्शक तत्वानुसार निर्मिती केंद्रे उभारणीची कार्यवाही करावी व यासाठी आवश्यक ते अनुदान प्राप्त करुन घ्यावे. या प्रयोजनार्थ राज्य शासनाकडून अनुदान दिले जाणार नाही. बेरोजगार अभियंता व सेवाभावी संस्था इमारत निर्मिती केंद्रे स्थापन करुन चालवू शकतील व लाभार्थ्यांची मागणी असल्यास त्यांना घरबांधणीत मदत करु शकतील. इमारत निर्मिती केंद्रे उभारण्याच्यासंदर्भात खादी व ग्रामोदयोग मंडळाकडे उपलब्ध असलेल्या अनुदान योजनेचा फायदा घेण्यात यावा. या निर्मिती केंद्राचा उपयोग इतर घरबांधणी योजनोसाठी सुध्दा करावा.

संबंधित जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार कार्यालयाने इमारत निर्मिती केंद्र चालविण्यासाठी बेरोजगार अभियंते व इतर बेरोजगार यांना या केंद्राचा लाभ घेण्यास उदयुक्त करावे.

## ८) **निधीची उपलब्धता व वाटप**

योजनेअंतर्गत खालीलप्रमाणे अनुदानाची रक्कम उपलब्ध करुन देण्यात येईल.

१. अ) ग्रामीण निवारा योजनेअंतर्गत बांधण्यात येणाऱ्या पहिल्या टप्प्यातील घरबांधणीसाठी केंद्र शासनाकडून (७५ टक्क्याप्रमाणे) प्रत्येकी रुपये ७,५००/- अनुदान (केंद्र शासनाचे अर्ध शासकीय पत्र क्रमांक : एच-११०३७/१/९८ आरएच, दिनांक १७.५.९९ अन्वये दिलेले मार्गदर्शक सूचनेप्रमाणे) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे सरळ वर्ग होईल.

(घरांसाठी अनुदान मिळाले नाही तर, अनुदान मिळालेली घरे वगळून उर्वरित घरांसाठी केंद्र शासनाच्या हिस्स्याएवढे अनुदान, केंद्र शासन सदरचे अनुदान देईल या अटीस अधीन राहून म्हाडाने जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या मागणीनुसार निधी वितरीत करावा. म्हाडाने दिलेल्या अनुदानाचा परतावा जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेने परस्पर म्हाडास करावा.)

ब) राज्य शासनाकडून राज्याचा २५ टक्के हिस्सा म्हणजे प्रत्येकी रुपये २,५००/- याप्रमाणे ४००० घरांसाठी अनुदान वेळेवर उपलब्ध होऊ शकले नाही तर, तात्पुरत्या

कालावधीसाठी म्हाडाने स्वतःच्या निधीमधून अनुदान वितरीत करावे. म्हाडा जेवढे अनुदान जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेस वितरीत करेल त्याचा परतावा शासनामार्फत केला जाईल.

वरील अ आणि ब मिळून एकूण रुपये १०,०००/- एवढे आणि इतर अनुदान परिशिष्ट क प्रमाणे देण्यात येईल.

प्रधान मंत्री ग्रामोदय (ग्रामीण आवास) योजनेतील मार्गदर्शक तत्वानुसार योग्य ती अंमलबजावणी करण्यासाठी अनुदान, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे वर्ग करण्यात येईल.

२. वरील १ मधील अनुदानाव्यतिरिक्त अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना विशेष घटक योजनेअंतर्गत शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. बीसीएच-२०००/७७७/प्र.क्र. १८८/मावक २, दिनांक १४.९.२००१ मधील तरतूदीनुसार या योजनेअंतर्गत पात्र अनुसूचित लाभार्थ्यांना विशेष घटक योजनेमधून घराच्या किंमतीच्या ३० टक्के निधीच्या उपलब्धतेनुसार बांधकामाच्या प्रगतीनुसार टप्प्याटप्प्याने अनुदान देण्यात येईल.

३. अनुसूचित जमातीच्या पात्र लाभार्थ्यांना आदिवासी उपाययोजनेअंतर्गत अनुज्ञेय असलेले अनुदान उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही आदिवासी विकास विभागाने करावी.

४. लाभधारक प्रकल्पाग्रस्त असेल व अशा लाभधारकाने यापूर्वी लाभ घेतला नसेल तर महसूल व वन विभागाकडून शासन निर्णय क्रमांक : आरपीए १०९९/१३५८/प्र.क्र./२२३/र-१, दिनांक १०.२.२००० नुसार रुपये १०,०००/- पर्यंत अनुज्ञेय असलेले सानुग्रह उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही पुनर्वसन विभागाने करावी.

५. ५०,००० पेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या शहरात बांधण्यात येणाऱ्या घरांसाठी खुल्या संवर्गकरीता तसेच आदिवासी उपाययोजना क्षेत्र वगळून इतर क्षेत्रातील अनुसूचित जमाती वर्गाकरीता शासनाकडून अनुदान मिळणार नाही.

६. केंद्र शासनाकडून व राज्य शासनाकडून मिळणारे अनुदान, लाभार्थ्यांच्या सहभागाची १० टक्के रक्कम आणि विशेष घटक योजनेअंतर्गत व आदिवासी उप योजनेअंतर्गत मिळणारे अनुदान वगळून आवश्यक असणारी उर्वरित रक्कम लाभार्थ्यांने कोणत्याही बँकेकडून कर्ज रुपाने घ्यावी. त्यासाठी शासकीय यंत्रणा मदत करेल. मात्र या कर्जासाठी शासन हमी देणार नाही किवा कर्ज काढतांना शासकीय अधिका-यांकडून अनामत रक्कम वा हिस्स्याची रक्कम भरली जाणार नाही.

७. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेने घरकुलांच्या बांधकामाच्या प्रगतीनुसार सोबतच्या परिशिष्ट ड मधील टप्प्यानुसार अनुदान वितरीत करावे.

८. सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, आदिवासी विकास विभाग, महसूल व वन विभाग (पुनर्वसन) इत्यादी विभागांनी अनुदालरची एक रकमी रक्कम जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे वर्ग करावी.

नागरी भागातील योजनेसाठी वरील विभागांनी अनुदानाची रक्कम नगर परिषदेकडे वर्ग करावी. नगर परिषदेने अनुदान टप्पानिहाय वितरीत करावे.

९. नागरी भागातील घरबांधणीसंबंधी नगरपरिषदेच्या मुख्याधिकाऱ्यांनी व ग्रामीण भागातील घरबांधणीसंबंधी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेने, त्यांच्याकडे जमा होणाऱ्या व त्यांच्याकडून खर्च होणाऱ्य रक्कमेचे हिशेब ठेवावयाचे असून ते दर महिन्यात केंद्र शासन व राज्य शासन आणि म्हाडास सादर करावयाचे आहेत. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासन, राज्य शासन आणि म्हाडास दर महिन्यास सादर करणे बंधनकारक राहील.

९) **लोकांचे प्रबोधन करणे**

संपूर्ण योजनेत जास्तीत लोकांनी सहभागी व्हावे, यासाठी जाहीरात देणे, लोकांशी संवाद साधणे, भिंतीपत्रके वाटणे, आकाशवाणीवरुन प्रचार करणे या व इतर माध्यमातून प्रचार करणे आवश्यक आहे. लोकांचे प्रबोधन करण्याची जबाबदारी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेची/जिल्हा प्रसिध्दी अधिकाऱ्याची राहील.

१०) **लेखाशिर्ष**

या योजनेसाठी लागणारा खर्च, (१) गृहनिर्माण विभाग, २२१६ गृहनिर्माण ०३- ग्रामीण गृहनिर्माण योजनृ सामाजिक न्याय विभाग (२) अ) मागणी क्र.एन-५, २२१६, गृहनिर्माण, ०२-नागरी गृहनिर्माण, (०३) लोक आवास योजना (२२१६-११८-५), (ब) मागणी क्र.एन-५, २२१६-गृहनिर्माण, ०३-ग्रामीण गृहनिर्माण, (०६) लोक आवास योजना (२२१६)-११९-४) (क) मागणी क्र.एन-५, २२१६-गृहनिर्माण, ०२-नागरी गृहनिर्माण,(१०४) सहकारी गृहनिर्माण (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना सहकारी गृहनिर्माण संस्थांना वित्तीय सहाय्य (२२१६-१०९-६), (३) आदिवासी विकास विभाग, क्र.२२१६ गृहनिर्माण विभाग, पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना-जनजाती क्षेत्र उपयोजना-०३-गृहनिर्माण ,१०४-सहकारी गृहनिर्माण संस्था, मागासवर्गीयांच्या सहकारी संस्थेचे आर्थिक सहाय्य (ए) राज्य योजनाअंतर्गत योजना (२२१६०७९७) आणि पुनर्वसन विभागाच्या शासन निर्णय दिनांक १०.२.२००० मधील १०.२.२००० मधील तरतूदीनुसार, करण्यात यावा.

११) हा शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ०७७/दिनांक १२.६.२००१, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३३८१/दिनांक ६.९.२००१, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २९०/१४७४/दिनांक १७.७.२००१, महसूल व वन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १०६६/दिनांक

८.१.२००१, सामाजिक न्याय, सांस्कृतीक कार्य व क्रिडा विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक आणि ८०/१९.१.२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

सही/-
(ल.दा.व्यास )
उप सचिव, महराष्ट्र शासन

# परिशिष्ट अ

## भारत सरकारचे ग्रामीण विकास मंत्रालय
## प्रधान मंत्री ग्रामोदय योजना
## (ग्रामीण आवास)
## मार्गदर्शक तत्वे
## (अनुवादीत)

सर्व मानवास निवारा ही मुलभूत गरज आहे. निवाऱ्यासह इतर उदा. पिण्याचे पाणी, सांडपाण्याची सोय व स्वच्छता या सुविधा आवश्यक असतात. ग्रामीण भागातील गरीबांना निवारा व इतर सुविधा उपलब्ध व्हावी यासाठी प्रधान मंत्री ग्रामोदय योजना राबविण्याची घोषणा केली गेलेली आहे. ग्रामीण भागातील गोरगरिबांना लाभ व्हावा यासाठी ही नवीन याजना आहे.

ग्रामीण भागातील गोरगरिबांना निवारा उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी ग्रामीण विकास मंत्रालयाला सोपविण्यात आली आहे. यापूर्वी ग्रामीण विकास मंत्रालयाने ग्रामीण भागातील गोरगरिबांसाठी इंदिरा आवास योजना कार्यान्वित केलेली आहे. ग्रामीण भागात जास्तीत जास्त घरे उपलब्ध व्हावी. ही व्यापक कल्पता विचारात घेऊन बहुउद्देशीय ग्रामीण क्षेत्रात ही नवीन योजना राबविण्याचा निर्णय घेण्यात आला असून, या योजनेअंतर्गत दारिद्रय रेषेखालील तथापि इदिरा आवास योजनेत फायदा न मिळालेल्या लोकांना निवारा उपलब्ध करुन द्यावयाचा आहे.

प्रधान मंत्री ग्रामोदय (ग्रामीण आवास योजना) इंदिरा आवास योजनेवर आधारीत राहील व ही योजना पूर्ण देशात राबविण्यात येईल.

**लक्षगट (टारगेट)**

या योजनेत ग्रामीण भागातील दारिद्रय रेषेखालील जे लोक अनुसूचित जाती, जमाती, मुक्त कामगार वर्ग, बिगर अनुसूचित जाती-जमाती यांना लक्ष गट (टारगेट) ग्रुप म्हणून लाभ द्यावयाचा आहे. बिगर अनुसूचित जाती-जमाती जे द्रारिद्रय रेषेखालील कुटुंब आहे त्यांना आर्थिक वर्षामध्ये एकूण घरापैकी ४० टक्क्यापेक्षा जास्त घरे दिले जाऊ नये तसेच दारिद्रश्य रेषेखालील अपंग व्यक्तींना तीन टक्के घरे देण्यात यावीत.

**लाभार्थ्यांची पात्रता**

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा/जिल्हा परिषदा यांच्यामार्फत प्रत्येक ग्रामपंचायतीसाठी घरांची संख्या निश्चित करावी व यांसंबधात ग्रामपंचायतला कल्पना देण्यात यावी. ग्रामपंचायत,

मार्गदर्शक तत्वानुसार दारिद्रय रेषेखालील कुटुंबांना लागणाऱ्या घरांची सूची तयार करुन सदर सूची पंचायत समितीला पाठवेल.

## घरांचे वितरण

योजनेंअंतर्गत बांधली जाणारी घरे सामान्यतः गावाच्या प्रमुख ठिकाणी वैयक्तिक जागेवर प्रामुख्याने बांधली जातील. रहिवासामध्ये घरकुले गटागटाने बांधली जाऊ शकतील, जेणेकरुन पायाभूत सुविधांचा विकास उदा. अंतर्गत रस्ते, सांडपाण्याची व्यवस्था, पाणीपुरवठा आणि इतर सामाजिक सुविधा उपलब्ध होऊ शकतील. घरकुले गावाच्या जवळपास बांधण्यात यावीत, जेणेकरुन सुरक्षा, संरक्षण, कामाचे ठिकाण जवळ असेल.

## लाभार्थ्यांचे सहभाग

योजनेअंतर्गत लाभार्थ्याने घर कसे बांधावयाचे आहे याचे त्याला स्वातंत्र असेल. योजनेअंतर्गत घरे बांधण्यासाठी कोणत्याही एजन्सीचा सहभाग असणार नाही. तसेच शासकीय/निमशासकीय संस्थेद्वारे घरे बांधली जाऊ नयेत. तथापि, शासकीय/निमशासकीय यंत्रणा लाभार्थ्यांना तांत्रिक सहाय्य देऊ शकतील. योजनेची कामे बाहेरील यंत्रणेद्वारा केली जाऊ नये. लाभार्थ्यांने स्वतः घराचे बांधकाम करणे आवश्यक आहे.

वेगवेगळया संस्थेद्वारा विकसित केलेल्या बांधकाम साहित्याचा उपयोग जास्तीत जास्त करण्याचा प्रयत्न करणे आवश्यक आहे. योजनेअंतर्गत घराचा नकाशा करण्याची आवश्यकता नसून, घराचे एकूण क्षेत्रफळ जवळपास २० चौ.मी. पेक्षा कमी होता कामा नये. योजनेअंतर्गत घरांचे ले-आऊट, आकार आणि डिझाईन ही स्थानिक परिस्थितीनुसार लाभार्थ्याच्या इच्छेनुसार असावी. पर्यावरण, आवश्यक क्षेत्र, स्वयंपाकघर, खेळती हवा, शौचालय आणि धुररहित चुल इत्यादी बाबी डिझाइनमध्ये आवश्यक आहे. याशिवाय सांस्कृतीक पध्दती सुध्दा डिझाईन बनवितांना सुध्दा विचारात घेण्यात याव्या. लाभार्थ्यावर घराच्या डिझाइनबाबत बंधन घालण्यात येऊ नये. अपंग व्यक्तीसाठी बांधण्यात येणारे घरं त्यांना बाधा होणार नाही अशी कल्पना विचारात घऊन तसेच त्यांना घरामण्ये मोकळेवपणाने वावता येईल अशा पध्दतीचे असावे. नैसर्गिक आपत्ती उदा. पूर, भूकंप व इतर बाबी विचारात घेऊन घराची डिझाईन बनवावी.

## धूररहित चुल आणि स्वच्छतागृह/शौचालय

योजनेअंतर्गत घरामध्ये धूररहित चूल असावी. अशा चुलींना इंधन कमी लागेल. चुली धूररहित असल्याने त्याच्या वापरात सुसूत्रता राहील. स्वच्छतागृह/शौचालय यांची बांधणी हा या योजनेचा प्रमुख घटक असेल. घराच्या अवतीभोवती वृक्ष लागवड करणे आवश्यक आहे.

## योजनेअंतर्गत अनुदानाची सीमा

योजनेअंतर्गत मैदानी क्षेत्रावर प्रति रु. २०,०००/- अनुदान देण्यात येईल. तसेच पहाडी/दुर्गम क्षेत्रात प्रति रु. २२,०००/- एवढे अनुदान देण्यात येईल. याशिवाय राहण्यासाठी उपयुक्त नसलेल्या घरांचे पुनर्बांधणी करण्यासाठी रु.१०,०००/- एवढे अनुदान देण्यात येईल.

## योजना राबविण्याची पध्दती

योजनेचे प्रस्ताव राज्य शासनाने केंद्र शासनाकडे पाठविणे आवश्यक आहे. घरबांधणीच्या प्रस्तावाव्यतिरिक्त अंतर्गत रस्ते, पाणीपुरवठा, जलनिस्सारण, वृक्षारोपण इत्यादी इत्यादी तसेच भूकंप विरोधी प्रस्ताव सुध्दा केंद्र शासनाकडे पाठवावेत. वरील बाबींचा खर्च हा एकूण प्रस्तावाच्या किंमतीच्या १० टक्के पेक्षा जास्त होऊ नये. २० टक्के प्रस्तावाचा निधी हा मोडकळीस आलेल्या/कच्च्या घराची दुरुस्ती पक्की करुन घेण्यासाठी वापरण्यात यावी. योजनेअंतर्गत राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची खालील समितीद्वारा छाननी केली जाईल/मंजूरी दिली जाईल.

| | | | |
|---|---|---|---|
| १. | सचिव, ग्रामविकास (केंद्र शासनाचे ग्राम विकास मंत्रालय ) | -- | अध्यक्ष |
| २. | अतिरिक्त सचिव तथा वित्त सल्लागार (ग्रामीण विकास) | -- | सदस्य |
| ३. | सल्लागार (ग्रामीण) योजना आयोग | -- | सदस्य |
| ४. | सह सचिव (ग्रामीण आवास) | -- | सदस्य |
| ५. | योजनेचे प्रभारू संचालक | -- | सदस्य सचिव |

## निधीचे वितरण

योजनेसाठी लागणारा निधी केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाकडून शिफारस मिळाल्यानंतर वित्त मंत्रालयाद्वारा राज्यांना दोन हप्त्यात निधीचे वितरण केले जाईल. दुसऱ्या हप्त्याची रक्कम, उपयोगिता प्रमाणपत्र तसेच ऑडीट रिपोर्ट प्राप्त झाल्यानंतर वितरीत केली जाईल. २०००-२००१ या कालावधीत चौकशीशिवाय वितरीत केले जाईल. राज्याला/केंद्र शासित प्रदेशाला जेवढा निधी आहे तेवढा निधी एका आर्थिक वर्षात दिला जाईल.

## देखभाल व मुल्यमापन

राज्य शासनाने जिल्हा ग्रामीण विकास संस्था, जिल्हा परिषदा यांच्याकडून वेळोवळी माहिती घऊन अंमलबजावणीबाबत माहिती ठेवणे आवश्यक आहे. जिल्हा ग्रामीण विकास संस्थेने वेळोवेळी योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी देखभाल करावी व यासंबधीचा

अहवाल वेळोवेळी निधारीत केलेल्या तक्त्यामध्ये राज्य शासनाला तसेच केंद्र शासनाला अवगत करणे आवश्यक आहे.

राज्य शासनाने या योजनेचा विचार करुन मुल्यांकन करावे. असे मुल्यांकन करतांना शासकीय/निमशासकीय/खाजगी संस्था यांची मदत घेतली जाऊ शकेल. या मुल्यांकनाच्या प्रती केंद्र शासनास पाठविणे आवश्यक आहे. केलेल्या मुल्यांकनाच्या अनुषंगाने योजनेमध्ये असलेले गुणदोष काढून टाकता येणे शक्य होईल.

-----------------

## परिशिष्ट-ब

## ग्रामीण निवारा, प्रधान मंत्री ग्रामोदय योजना (ग्रामीण आवास) आणि नागरी निवारा योजना राबविण्याचा कालबध्द कार्यक्रम २००१-२००२

| अ.क्र. | कार्यटप्पा | कालावधी | यंत्रणा |
|---|---|---|---|
| १. | लोकांचे प्रबोधन करणे | २ ऑक्टोबर -- २० ऑक्टोबर,२००१ | जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा |
| २. | लोकांचे अर्ज व छाननी | २१ ऑक्टोबर -- ५ नोव्हेंबर, २००१ | मुख्य आधिकारी नगरपालिका |
| ३. | लाभार्थींची पात्रता ठरविणे व लाभार्थींची निवड यादी निश्चित करणे | ६ नोव्हेंबर -- २० नोव्हेंबर, २००१ | जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा कार्यकारी समिती |
| ४. | योजनेच्या अनुदानाचा प्रस्ताव तयार करणे, सक्षम प्राधिकाऱ्यास सादर करणे व सक्षम प्राधिकाऱ्याने मंजूरी देणे आणि बँकेस लाभार्थींचा कर्जाचा प्रस्ताव सादर करणे. | २१ नोव्हेंबर -- १५ डिसेंबर, २००१ | जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा कार्यकारी समिती |
| ५. | बँकेने कर्ज मंजूर करणे | ११ डिसेंबर -- ३० डिसेंबर, २००१ | जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा कार्यकारी समिती व लाभार्थी |
| ६. | लाभार्थीने बांधकामाची सुरुवात करणे | १ जानेवारी | लाभार्थी |
| ७. | बांधकाम पूर्ण करणे | ३१ मार्च | |

ग्रामीण निवारा योजना..
राज्यात ग्रामीण/नागरी भागात
आर्थिकदृष्टया
दुर्बल/बेघर/अल्प
भूधारक घरबांधणी घरकुल
योजना

महाराष्ट्र शासन,
गृहनिर्माण विभाग,
शासन निर्णय क्रमांक : घरकुल २०००/प्र.क्र. ३३०/गृनिधो-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक २९ जानेवारी, २००२

पहा : शासन निर्णय : गृहनिर्माण विभाग क्रमांक - घरकुल २०००/प्र.क्र. ३३०/गृनिधो-१, दिनांक २५.९.२००१.

**शुध्दीपत्रक :**

१) संदर्भाधिन शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक २ पात्र लाभार्थी व लाभार्थ्यांनी करावयाची पूर्तता यातील अट क्रमांक ७ मध्ये पुढील मजकूर अंतर्भूत करावा. लाभधारक कुटुंबाने या योजनेंतर्गत घरबांधणी अनुदान मिळणेबाबतचा अर्जासोबत घरबांधणीस येणाऱ्या खर्चाच्या १० टक्के रक्कम, त्याचा सहभाग म्हणून भरणे आवश्यक आहे. तथापि, जो लाभार्थी १० टक्के रक्कम रोख स्वरुपात भरु शकणार नाही, त्याला जिल्हाधिकाऱ्याने निर्णय दिल्यास, १० टक्के रक्कमे इतके श्रमदान करावयाची परवानगी देता येईल.

२) संदर्भाधिन शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक २ मधील अट क्रमांक १० नुसार योजनेंतर्गत गावात/शहरात किमान २५ घरांची मागणी बंधनकारक ठरविण्यात आली होती ही अट आता शिथील करुन इष्टांकपूर्ती होत नसेल उद्दिष्ट पूर्ण करावयाचे असेल तर २५ घरांपेक्षा कमी असलेल्या गावातसुध्दा ही योजना राबविण्याबाबत निर्णय घेण्यासाठी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३) संदर्भाधिन शासन निर्णयातील मुद्दा क्र. ८ निधीची उपलब्धता व वाटप यातील उपमुद्दा क्र. ५ नुसार ५०००० पेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या शहरात बांधण्यात येणाऱ्या घरांसाठी खुल्या संवर्गातील, लाभार्थ्यांसाठी शासनाकडून अनुदान उपलब्ध करुन देण्यांत आलेली नाही. तथापि संबंधित नगरपालिका आर्थिकदृष्टया सक्षम असतील आणि त्यांच्याकडे घरकुल योजनेसाठी अनुदान देण्याबाबतच्या योजना असतील, तर अशा नगरपालिका स्थायी समितीची मान्यता घेऊन, खुल्या संवर्गातील दारिद्रय रेषेखालील लोकांना अनुदान देऊ शकतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

सही/-
( व. दा. राठोड )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

ग्रामीण निवारा योजना..
राज्यात ग्रामीण/नागरी
भागात
आर्थिकदृष्टया
दुर्बल/बेघर/अल्प
भूधारक घरबांधणी घरकुल
योजना

**महाराष्ट्र शासन,**
**गृहनिर्माण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : घरकुल २०००/प्र.क्र. ३३०/गृनिधो-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक २९ जानेवारी, २००२

पहा : १) शासन निर्णय : गृहनिर्माण विभाग क्रमांक - घरकुल २०००/प्र.क्र. ३३०/गृनिधो-१, दिनांक २५.९.२००१.
२) शुध्दीपत्रक, गृहनिर्माण विभाग, क्रमांक - घरकुल २०००/प्र.क्र. ३३०/गृनिधो-१, दिनांक २९ जानेवारी २००२.

**प्रस्तावना** : राज्यात ग्रामीण/नागरी भागात आर्थिकदृष्टया दुर्बल/बेघर/अल्प भूधारक घटकांसाठी घरकूल योजना ग्रामीण निवारा योजना या नांवाने राबविण्याचा निर्णय संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये घेण्यांत आलेला आहे. सदर योजने अंतर्गत कालबध्द कार्यक्रमानुसार घरबांधणी कार्यक्रम मार्च अखेरपर्यंत पूर्ण होणे अपेक्षित होते. तथापि अंमलबजावणी करतांना येणाऱ्या अडचणीमुळे तसे विहित मुदतीत निधी उपलब्ध न झाल्याने, सदरची योजना कालबध्द कार्यक्रमानुसार राबविणे शक्य झाले नाही. त्यामुळे सदर योजना राबविण्यासाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :** ग्रामीण निवारा योजने अंतर्गत योजना राबविण्याच्या कालबध्द कार्यक्रमानुसार योजना पूर्ण करण्यासाठी सप्टेंबर, २००२ अखेरपर्यंत या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-
**(व.दा. राठोड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभागातील योजना**
**जिल्हा**
**परिषदांकडे हस्तांतरीत**
**करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन,**
**गृहनिर्माण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : एचएसजी २०००/प्र.क्र. ४०५/गृनिधो-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक २९ जुलै, २००२

पहा : १) शासन निर्णय : गृहनिर्माण विभाग क्रमांक - घरकुल २०००/प्र.क्र. ३३०/गृनिधो-१, दिनांक २५.९.२००१.
३) शुध्दीपत्रक, गृहनिर्माण विभाग, क्रमांक - घरकुल २०००/प्र.क्र. ३३०/गृनिधो-१, दिनांक २९ जानेवारी २००२.

प्रस्तावना : महाराष्ट्रात त्रिस्तरीय पंचायतराज संस्था दिनांक १ मे. १९६२ पासून अस्तित्वात आली. जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांना ग्रामीण विकासाशी संबंधित विषयाबाबत प्रशासकीय व विकास विषयक जबाबदाऱ्या सोपविण्यांत आलेल्या आहेत. महाराष्ट्र शासनाने पंचायतराज मुल्यमापन समितीचा अहवाल लक्षात घेता त्यांच्या शिफारशीनुसार तसेच ७३ व्या घटना दुरुस्तीनुसार घटनेच्या अनुच्छेद २४३ (जी-४) अनुसूचित ११ मधील विषय पंचायतराज संस्थेकडे देण्याच्या झालेल्या शासन निर्णयानुसार ग्रामीण विकासाशी संबंधितं आणि ग्रामीण भागात कार्यरत असलेली ग्रामीण निवारा योजनेतील (अ) क्रेडिट कम सबसिडी (ब) प्रधानमंत्री ग्रामोदय योजना, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १०० अंतर्गत जिल्हा परिषदेकडे हस्तातरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :**

भारतीय संविधानातील ७३ व्या घटनादुरुस्तीनंतर अधिकारांचे विकेंद्रीकरण करण्याच्या दृष्टीकोनातून ग्रामीण विकासाशी संबंधित आणि ग्रामीण भागात कार्यरत असलेली ग्रामीण निवारा योजनेतील (अ) क्रेडिट कम सबसिडी (ब) प्रधानमंत्री ग्रामोदय योजना महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १०० अंतर्गत जिल्हा परिषदेकडे खालील अटीस अधिन राहून हस्तांतरीत करण्यांत येत आहे.

१. हस्तांतरीत होणाऱ्या योजना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार आणि संदर्भाधिन शासन निर्णयानुसार राबवाव्या.

२. मागील वर्षी सन २००३-२००३ करिता योजनांसाठी करण्यांत आलेल्या एकूण तरतूदीतून झालेला खर्च व त्यानंतर दिनांक ३१ मार्चख्, २००३ पर्यंतच्या कालावधीकरीता शिल्लक असलेली तरतूद जिल्हा परिषद निहाय सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी यांना कळवावी. या तरतूदीतील वरील कालावधीतील खर्चाची देयके जिल्हा परिषदेच्या घरबांधणी अधिकाऱ्यांना आहरित करावी. या प्रयोजनासाठी जिल्हा परिषदेतील मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यांत येत आहे.

२अ)योजना उपलब्ध कर्मचाऱ्यांडून राबविण्यांत यावी.

३. वरील कोषागारातून काढण्यांत आलेल्या रकमांच्या खर्चाची मासिक विवरण पत्रे संबंधितांनी लेखाशिर्षाच्या तपशिलासह व प्रमाणक क्रमांक, दिनांक विचारात घेऊन खर्चाच्या ताळमेळाची कार्यवाही पार पाडावी.

४. प्रत्येक वित्तीय वर्षात किती सदनिकांचे बांधकाम करावयाचे आहेत. यांचे प्रस्ताव एप्रिलमध्ये शासनास सादर करणे आवश्यक आहे.

५. जिल्हा परिषदेमार्फत या योजना कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक ती मान्याता जिल्हा परिषद अधिनियमास अनुसरुन सक्षम प्राधिकाऱ्यांकडून घेण्यांत यावी व त्यासाठी मान्यता घेण्याची कार्यवाही जिल्हा परिषदा व पंचायत समित्या लेखा संहिता १९६८ प्रमाणे राहिल.

६. चालू वित्तीय वर्षाचा खर्च संबंधित योजनांचा सध्याच्या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व मंजूर तरतूदीतून भागविण्यांत यावा.

७. संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतूदीनुसार संबधित विभागाकडून निधी उपलब्ध करुन घेण्याची कार्यवाही करावी.

हा शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग, नियोजन विभाग, महसूल व वन विभाग, सामाजिक न्याय विभाग, आदिवासी विभाग, पुनर्वसन विभाग यांच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०१७, दिनांक १४.१.०२ अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

महराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**सहि/-**
**(व.दा. राठोड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

# अधिसूचना

**गृहनिर्माण विभाग,**
**मंत्रालय मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक २९ जुलै,२०००२.**

महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या अधिनियम, १९६१

क्रमांक : एचएसजी-२००१/प्र.क्र. ४०५/गृनिधो-१ :- महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या अधिकनयम, १९६१ (१९६२ चा ६ चा महा. ५) याच्या कलम १०० च्या पोटकलम (१) खंड (ब) व कलम ६ च्या पोटकलम (२) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन आणि यासंबंधात समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करुन महाराष्ट्र शासन याद्वारे असे निदेश देत आहेत की,

(क) याला जोडलेल्या अनुसूचिच्या स्तंभ (२) मध्ये नमूद केलेल्या ज्या सर्व योजना जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणाद्वारे मुंबई व मुंबई उपनगर जिल्हे वगळून इतर सर्व जिल्हयात राबविण्यात येत होत्या. त्या आता या अनुसूचीच्या स्तंभ ३ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या अटी व शर्ती यांच्या अधिनतेने त्या त्या जिल्हा परिषदांकडे हस्तांतरीत व निहित करण्यात येत आहेत.

(ख) उपरोक्ताप्रमाणे योजना त्यांच्याकडे हस्तांतरीत केल्यावर सर्व जिल्हा परिषदांना, उक्त योजना जेथे कार्यरत आहेत अशा जिल्हयाबाहेरील परंतू जिल्हा परिषदांची ज्यासाठी स्थापना करण्यात आली आहे अशा महसुली जिल्हयांकध्ये असलेल्या कोणत्याही अतिरिक्त क्षेत्रावर, उक्त योजनांच्या सर्व प्रयोजनांसाठी प्राधिकार असेल.

**अनुसूचि**

| अ.क्र. | योजनेचे नाव | अटी व शर्ती |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | कर्ज-नि-अर्थसहाय्य योजना | १) ही केंद्र पुरस्कृत योजना असल्याने, भारत सरकारच्या ग्रामीण मंत्रालयाने घालून दिलेली मार्गदर्शक तत्व त्या जिल्हापरिषदांना अनि बंधनकारक असतील.<br>२) या योजनेखालील लाभार्थ्यांचे वार्षिक उत्पन्न रु. ३२,०००/- प्रतिवर्ष अधिक असता कामा नये.<br>३) या योजनासाठी दारिद्रय रेषेखालील ग्रामीण कुटुंबांना प्राथम्य दिले जा<br>४) या योजनेखालील अर्थसहाय्य म्हणून वाटप करण्यात आलेल्या किमान ६० टक्के रकमेचा उपयोग अनुसूचित जाती, अनुसूचित ज |

मुक्त वेठबिगार यांच्या घरांच्या बांधकामासाठी निधी देण्यात केला जा

५) या योजनेखालील अर्थसहाय्याची कमाल मर्यादा रु.१०,०००/- इतकं या अर्थसहाय्यापैकी, केद्र शासन ७५ टक्के म्हणजे ७,५००/- इतकी देईल आणि राज्याचा वाटा २५ टक्के म्हणजे रु. २.५००/- इतके आणि बाकीच्या रकमेसाठी लाभार्थी बँका किंवा खाजगी वित्त संस्थ घेतलेल्या कर्जाच्या रुपात अंशदान करतील आणि या कर्जासाठी कोणत्याही प्रकारची हमी देणार नाही.

जिल्हा परिषदेला, नियतकालिक अहवाल व विहित नमुन्यातील विवरणप विहित मुदतीच्या आत राज्य शासनाला किंवा यथास्थिती केंद्र शासनाला करणे अनिवार्य व बंधनकारक करण्यात आले आहे आणि जिल्हा परिषदांनी या योजना राज्य/केंद्र शासनाच्या निर्णयानुसार राबविण्यल्या पा

| | | |
|---|---|---|
| २. | प्रधानमंत्री ग्रामोदय योजना (ग्रामीण क्षेत्रे) | १) ही केंद्र पुरस्कृत योजना असल्यामुळे भारत सरकारच्या ग्रामीण मंत्रालयाने घालून दिलेली मार्गदर्शक तत्वे जिल्हा परिषदांना अनि बंधनकारक असतील. |

२) ज्या कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रु. २०,०००/- पेक्षा कमी आहे, जे रेषेखाली रहात आहेत, आणि ज्यांना इंदिरा आवास योजनेचा मिळालेला नाही अशी कुटुंबे, केंद्र सरकारने घालून दिलेल्या मा तत्वानुसार या योजनांसाठी पात्र आहेत.

३) अनुसूचित जातींचे किंवा अनुसूचित जमातीचे आणि मुक्त वेठबिगार अनुसूचित जातीचे किंवा अनुसूचित जमातींचे नसलेले ग्रामीण क्षे दारिद्रय रेषेखाली राहणारे लोक हे या योजनेंतर्गत घरांसाठीचे असतील.

अनुसूचित जातीतर/जमातीतर किंवा दारिद्रयरेषेखालील लो निवासी घरांच्या बांधकामासाठी एका वित्तीय वर्षामध्ये एकूण वाटपाच टक्केहून अधिक नसेल इतक्या रकमेचा वापर करता येईल. दारिद्रय रेषे राहणाऱ्या विकलांग व्यक्तींच्या लाभासाठी एकूण निधीच्या ३ टक्के अलग राखून ठेवण्यात येईल.

४) या योजनेअंतर्गत प्रत्येक ग्रामपंचायतीसाठी बांधावयाच्या घरांची जिल्हापरिषद ठरविल व ती संख्या उक्त ग्रामपंचायतीला त कळविण्यात येईल. त्यानंतर, नेमून दिलेल्या लक्षाच्या मर्यादेत ग्र पात्र कुटुंबांच्या सूचितून लाभार्थ्यांची निवड करील. मध्यम स्तर पंचायतीला (पंचायत समिती) निवडलेल्या लाभार्थींची सूची प्रप राज्य शासनास किंवा केंद्र शासनास विहित वेळेत जिल्हा परि माहिती सादर करील.

५) घराच्या बांधकामाच्या पध्दतीसंबंधी लाभार्थीस पूर्ण स्वातंत्र असेल,

ज्योत्याचे क्षेत्रफळ २० चौ.मी. पेक्षा कमी असू नये. या मुद्दय
घराच्या संकल्पनेवरील कोणतीही बाब विहित केलेली नसेल.

६) या योजनेअंतर्गत बांधकाम सहाय्याची कमाल मर्यादा मैदानी प्रदे
प्रत्येक घराला रु. २०,०००/- आणि डोंगराळ किंवा अवघड प्रदे
प्रत्येक घराला रु. २२,०००/- इतकी असेल.

७) नियतकालिक अहवाल आणि विहित प्रपत्रातील विवरण राज्य शा
किंवा केंद्र शासनाला विहित वेळेत सादर करणे जिल्हा परिषदेला
बंधनकारक केलेले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**सही/-**
**(व.दा. राठोड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

## NOTIFICATION

Housing Department,
Mantralaya, Mumbai-
400 032.

Dated the 29 th Jul.
2002

Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961

No. hsg-2001/cr 405/GND-1, In exercise of powers confered by clause (b) of sub-section (1) of sectiona 100 and sub-section (2) of section 6 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 (Mah. V of 1962), and of all other powers enabling in that behalf, the Government of Maharashtra hereby directs that –

(a) all Schemes mentioned in column (2) of the Schedule hereto which were implemented by the DRDA in every district except Mumbai and Mumbai Suburban District shall now be transferred to, vested in, the respective Zilla Parishads subject to the terms and conditions specified against it in column (3) of that Schedule, with effect from the date of publication of the Notification;

(b) all Zilla Parishads shall, on transfer of the Schemes to them as aforesaid, shall also have the authority for all purposes of the said Schemes, over any additional area in which the said Scheme are oprating which is outside the district, but within the revenue districts for which the Zilla Parishads are established.

## SCHEDULE

| Sr.No.<br>1 | Name of the Scheme<br>2 | Terms and Conditions<br>3 |
|---|---|---|
| 1. | Credit-cum-Subsidy Scheme | 1) The Scheme being Centrally Sponsored, guid of Ministry of Rural Developement, Governm India are absolute and obligatory on the resp Zill Parishads.<br>2) Under the Scheme beneficiaries annual ir should not be more than Rs. 32,000/- per annu<br>3) For this Scheme preference should be giv below poverty line Rural Households.<br>4) At least a minimum of 60% of the funds allo under this scheme as subsidy shall be utilis financing the construction of houses for Sche Castes, Scheduled Tribes and freed b labourers.<br>5) Ceiling of subsidy under this scheme is Rs. 10<br>Out of this subsidy, Central Government 75% i.e.Rs. 7,500/- and State share shall be 25 |

Rs.2,500/- and the remaining amount will be contr by beneficiaries as as aloan from Banks and F Finance Institutions and for this Government shou give any guarantee in any forms.

(6) It is made absolute and obligatory to the Parishad to submit periodical reports and retu prescribed proforma to the State Government or C Government, as the case may be, within prescribe and Zilla Parishad should implement this Sc according to the resolutions of the State/C Government.

2. Pradhan Mantri Gramodaya Yojana (Gramin Awas )

(1) The scheme being Centrally sponsored, Guideli the Ministry of Rural Development, Governmen India are absolute and obligatory to the Zilla Parishads.

(2) The families whose annual income is below 20,000/- and those who live below poverty lin those who have not got benefit of Indira Yojana, are eligible for this Scheme according guidelines of the Central Government.

(3) The target group for houses under the schem be the people who are living below the poverty the rual areas, belonging to Scheduled Cas Scheduled Tribes and freed bonded labourer non-Scheduled Castes or Scheduled categories.

Not more than 40% of the total allo during a financial year can be utilise construction of dwelling unit for Non-Sche Castes, or living below poverty line, while fu the tune of 3% will be earmarked for the ben the persons who are living below povert disabled persons.

(4) Under this scheme Zilla Parishads will decic number of house to be constructed for every V Panchayat and the same will immediate intimated to the said village Panchayat. There the Gram Sabha will select the beneficiaries fro list of eligible households restricting this numb the target allotted. The intermediate level panc (Panchayat Samiti) will invariably be sent a selected beneficiaries proforma to the Government or Central Government withi prescribed time.

(5) The beneficiaries will have complete fre regarding the manner of consideration of the h

No type design should be prescribed for dv
units except that the plinth area of the houses s
not be less than 20 sq.mtrs.

(6) The ceiling of construction assistance unde
scheme will be Rs. 20,000/- per unit for plair
and Rs. 22,000/- per unit for hilly or difficult area

(7) It is made absolute and obligatory to the
Parishad to submit the prescribed reports and r
in the prescribed proforma to the State Gover
or Central Government within the prescribed tin

By order and in the name of the Governor of Mahrashtra,

Sd/-
(V.D. Rathod )
Under Secretary to
Government.